राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांच्या
वाहतूक भत्त्याच्या (Transport Allowance)
दरांत सुधारणा करणेबाबत......

महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांकः वाहभ -२०२०/प्र.क्र.०३/२०२०/सेवा- ५**

खो.क्र.३३५ (विस्तार), तिसरा मजला, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० एप्रिल, २०२२

वाचा-

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२००९/प्र.क्र.७८/सेवा-५, दि.०५ एप्रिल, २०१०
२) शासन शुद्धीपत्रक, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२००९/प्र.क्र.७८/सेवा-५, दि.०७ सप्टेंबर, २०११
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२०१४/प्र.क्र.५/सेवा-५, दि.०३ जून, २०१४
४) शासन शुद्धीपत्र, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२०१४/प्र.क्र.५/सेवा-५, दि.०४ जून, २०१४
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२०१४/प्र.क्र.१६/सेवा-५, दि.१० ऑगस्ट, २०१५
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२०१२/प्र.क्र.२८/सेवा-५, दि.०३ एप्रिल, २०१७
७) शासन पूरकपत्र, वित्त विभाग, क्रमांक :वाहभ-२०१४/प्र.क्र.१६/सेवा-५, दि.१८ एप्रिल, २०१७
८) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.२१/५/२०१७-ई.दोन(बी), दि.०७ जुलै, २०१७
९) केंद्र शासन, वित्त मंत्रालय, व्यय विभाग यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.२१/५/२०१७-ई.दोन(बी), दि.०२ ऑगस्ट, २०१७
१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :घभाभ-२०१९/प्र.क्र.२/सेवा-५, दि.०५ फेब्रुवारी, २०१९

प्रस्तावना -

केंद्र शासनाने सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने वरील (८) व (९) येथील अनुक्रमे दि. ०७ जुलै, २०१७ व दि. ०२ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या आदेशान्वये त्यांच्या कर्मचाऱ्याच्या निवासस्थानापासून कर्तव्य स्थानापर्यंतच्या प्रवासावरील खर्चाची भरपाई म्हणून सुधारीत दराने वाहतूक भत्ता (Transport Allowance) मंजूर केलेला आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम,२०१९ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना दि. ०१ जानेवारी, २०१६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना मंजूर केलेल्या वाहतूक भत्त्याच्या दरांत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

शासन असे आदेश देत आहे की, राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या वाहतूक भत्त्याचे दर खालील तक्त्यात दर्शविल्या प्रमाणे सुधारण्यात यावेत.

हे आदेश दि.०१.०४.२०२२ पासून अंमलात येतील.

| राज्य शासकीय कर्मचारी व अधिकारी यांचे वेतन स्तर (Pay Level) मधील वेतन | वाहतूक भत्त्याचा दर (रू.) | |
|---|---|---|
| | बृहन्मुंबई नागरी समूह, नागपूर नागरी समूह व पुणे नागरी समूह | इतर ठिकाणे |
| एस-२० व त्यावरील | रू. ५४००/- | रू. २७००/- |
| एस-७ ते एस-१९ | रू. २७००/- | रू. १३५०/- |
| एस-१ ते एस-६ | रू. १०००/- | रू. ६७५/- |

उपरोक्त एस-१ ते एस-६ या वेतन स्तर मधील रु.२४२००/- व त्यापेक्षा जास्त वेतन आहरित करणाऱ्या बृहन्मुंबई नागरी समूह, नागपूर नागरी समूह व पुणे नागरी समूह मधील कार्यरत कर्मचाऱ्यांना रु.२७०० व इतर ठिकाणी कार्यरत कर्मचाऱ्यांना रु.१३५० इतका वाहतुक भत्ता अनुज्ञेय राहील.

तसेच अंध, अस्थिव्यंगाने अधु आणि कण्याच्या विकाराने पीडीत असणाऱ्या तसेच मुकबधीर / श्रवणशक्तीतील दोष असणाऱ्या राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना सध्या अनुज्ञेय असणाऱ्या वाहतूक भत्त्यामध्ये पुढील प्रमाणे वाढ करण्यात येत आहे.

| राज्य शासकीय कर्मचारी व अधिकारी यांचे वेतन स्तर (Pay Level) मधील वेतन | वाहतूक भत्त्याचा दर (रू.) | |
|---|---|---|
| | बृहन्मुंबई नागरी समूह, नागपूर नागरी समूह व पुणे नागरी समूह | इतर ठिकाणे |
| एस-२० व त्यावरील | रू. १०,८००/- | रू. ५४००/- |
| एस-७ ते एस-१९ | रू. ५४००/- | रू. २७००/- |
| एस-१ ते एस-६ | रू. २२५०/- | रू. २२५०/- |

अंध, अस्थिव्यंगाने अधु आणि कण्याच्या विकाराने पीडीत असणाऱ्या तसेच मुकबधीर / श्रवणशक्तीतील दोष असणाऱ्या उपरोक्त एस-१ ते एस-६ या वेतन स्तर मधील रु.२४२००/- व त्यापेक्षा जास्त वेतन आहरित करणाऱ्या बृहन्मुंबई नागरी समूह, नागपूर नागरी समूह व पुणे नागरी समूह मधील कार्यरत कर्मचाऱ्यांना रु.५४०० व इतर ठिकाणी कार्यरत कर्मचाऱ्यांना रु.२७०० इतका वाहतुक भत्ता अनुज्ञेय राहील.

२. या आदेशातील वाहतूक भत्त्याचे प्रदान खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन आणि त्यानुसार विनियमित करण्यात येईल.

एक) कर्तव्य स्थानापासून एक किलोमीटर अंतराच्या आत किंवा कर्तव्यस्थान आणि निवासस्थान यांच्या एकत्र परिसरात शासकीय निवासस्थान पुरविण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

दोन) ज्या कर्मचाऱ्यांना शासकीय वाहतूक सुविधा पुरविण्यात आली आहे, त्यांना हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

तसेच वाहतूक भत्त्याचे प्रदान करण्यासंदर्भात इतर विद्यमान तरतुदी व कार्यपद्धती आहे त्याचप्रकारे यापुढे लागू राहील.

३. रजा, प्रशिक्षण, दौरा इत्यादी कारणांमुळे संपूर्ण कॅलेंडर महिन्यात अनुपस्थित असल्यास त्या महिन्यात हा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४. शासन असेही आदेश देत आहे की, सर्व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक, माध्यमिक शाळांतील पूर्णकालीक शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी तसेच कृषि व कृषितर विद्यापीठांमधील व तत्संलग्न महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना सदरहू आदेश लागू असतील.

५. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा अधिनियम क्रमांक ५) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार व त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करुन शासन असेही आदेश देत आहे की, जिल्हा परिषदांच्या पूर्णकालिक कर्मचाऱ्यांना हे आदेश योग्य त्या फेरफारासह लागू करण्यात यावेत.

६. शासन असेही आदेश देत आहे की, विद्यापीठ अनुदान आयोगाच्या वेतनमानानुसार वेतन घेणाऱ्या शिक्षक कर्मचाऱ्यांनाही हे आदेश लागू करण्यात यावेत.

७. शासकीय कर्मचाऱ्यांच्या वाहतूक भत्त्यावरील खर्च त्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. अनुदानप्राप्त संस्था, नगरपालिका व जिल्हा परिषदा यांच्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत, संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या उप लेखाशीर्षाखाली त्यांच्या सहाय्यक अनुदानाबाबतचा खर्च खर्ची टाकण्यात येतो, त्या उप लेखाशीर्षाखाली हा खर्च खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२०१२५५१०७२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINAYAK ARVIND DHOTRE

Digitally signed by VINAYAK ARVIND DHOTRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=857ec0d4ffa11afd448c1db99e6d5447265170ecc87e6e5c74be1217bec62ba9, pseudonym=665FDB850C8B6CA644B6C6EE747AADB7FBEF1429, serialNumber=EED64FF5F3811D4C3522D8713ED9A9090E2A4F33552EEA2364D17D782C35E926, cn=VINAYAK ARVIND DHOTRE
Date: 2022.04.20 12:57:12 +05'30'

**( वि. अ. धोत्रे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

| | |
|---|---|
| राज्यपालांचे सचिव<br>मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव<br>उपमुख्यमंत्री यांचे सचिव<br>सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव<br>मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई<br>सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व | निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई<br>सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,<br>लेखा अधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.<br>संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई, |

| | |
|---|---|
| संसद सदस्य<br>मंत्रालयीन सर्व विभाग<br>सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव मंत्रालय, मुंबई<br>सचिव, मा.सभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई<br>सचिव, मा.अध्यक्ष, विधान सभा, विधानमंडळ, मुंबई<br>मंत्रालयीन सर्व विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख<br>प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा),मुंबई.<br>प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा),मुंबई.<br>सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.<br>सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.<br>प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई.<br>मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई<br>आयुक्त राज्य माहिती आयोग,(सर्व)<br>सचिव राज्य निवडणूक आयोग,मुंबई.<br>प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/ औरंगाबाद.<br>महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे<br>सर्व विभागीय आयुक्त.<br>सर्व जिल्हाधिकारी<br>सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.<br>महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.<br>महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई<br>महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर<br>महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर<br>सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय, (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,<br>संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई<br>अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई<br>संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, मुंबई,<br>सहसंचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर. | विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,<br>ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.<br>इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५<br>नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ३८<br>शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८<br>भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २०<br>बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १<br>भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४,राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई ४<br>भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३<br>महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८<br>वित्त विभागातील सर्व कार्यासने<br>निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-५) |